**संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वित्तीय सल्लागार (महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी) व लेखाधिकारी (गट-अ) या अस्थायी पदास मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-०२१९/प्र.क्र.३२/ पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ सप्टेंबर, २०२०.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-०२१६/प्र.क्र.६५/पोल-३, दि. ०२.०८.२०१८.

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-०२१९/प्र.क्र.३२/पोल-३, दि१७.०३.२०२०.

३) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/ मुदतवाढ/संचालक/मपोअ/१२/२०१८, दि.३०.०७.२०२०.

४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/आ.पु.क., दि.३१.०८.२०२०.

**शासन निर्णय:-**

संचालक,महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक या संस्थेला गृह विभाग,शासन निर्णय दि.०५.०२.२०१६ अन्वये स्वायत्त संस्थेचा दर्जा दिला असुन ही संस्था पोलीस दलाचे शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून कार्यरत आहे. महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक या संस्थेचे वार्षिक अंदाजपत्रक सुमारे रु.६५ कोटी इतके आहे. कामाचा वाढता व्याप, आर्थिक व्यवहार, वित्तीय जबाबदारी व शासनाने घेतलेला धोरणात्मक निर्णय इ. बाबी लक्षात घेता या संस्थेची लेखाविषयक बाबी हाताळण्याची जबाबदारी मोठया प्रमाणावर वाढण्यासोबतच या लेखाविषयक बाबी काटेकोरपणे हाताळता याव्यात यासाठी संचालक,महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी यांच्या आस्थापेनवर वित्तीय सल्लागार व लेखा अधिकारी ही नवीन पदे उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.०२.०८.२०१८ अन्वये निर्माण करण्यात आलेली आहेत. सदर नव्याने निर्माण केलेली २ पदे अस्थायी स्वरुपाची आहेत.

अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.३ येथे नमूद दिनांक ३०.०७.२०२० च्या पत्रान्वये संचालक,महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवरील वित्तीय सल्लागार (महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी) व लेखाधिकारी(गट-अ) या पदांना दि.०१.०९.२०२० पासून मुदतवाढ मिळणेबाबत विनंती केली आहे.

२. सदर पदे ज्या परिस्थितीत निर्माण करण्यात आली होती ती परिस्थिती अद्यापही कायम आहे. यास्तव, उक्त संचालक,महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवरील वित्तीय सल्लागार

(महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी) व लेखाधिकारी(गट-अ) या पदांना **दिनांक ०१.०९.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

२) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

३) कोणत्याही परिस्थितीत सर्व पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.०४ येथील दिनांक ३१.०८.२०२० च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २८.०२.२०२१ अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदाला त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

३. सदरचा खर्च “२०५५-पोलीस-(००)(१०९) जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दत्तमत्त (२०५५०१६८)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/आपुक., दिनांक ३१.०८.२०२० अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२१११३९३४४६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2020.09.21 11:39:27 +05'30'

**( दिनेश सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
५. संचालक,महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
७. गृह विभाग, कार्यासन (पोल-५अ).
८. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
९. निवड नस्ती (पोल-३).